**राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून सन २०११ -१२ मध्ये तेलताड क्षेत्र विस्तार योजना राबविण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : तेविका- १६११/ प्र.क्र. १५३ /४-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ३० ऑगस्ट, २०११**

**संदर्भ:** १) केंद्र शासनाचे पत्र क्र. नं. १-३/ २०११- आरकेव्हीवाय, दि. २/ ६/२०११
२) शासन निर्णय क्र. आयएसओपी -१६११/ प्र.क्र. १३८/ ४अे.दि. ०७ जून, २०११
३) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र. कृ.आ. / फलो-१/ रोहयो / तेलताड/१६०२ /११, दि. १४ /६/२०११
४) शासन निर्णय क्र. राकृवि-२०११/ प्र.क्र. ६३/ राकृवियो, दि. ३० जुलै, २०११

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०११ - १२ मध्ये तेलताड क्षेत्र विस्तार कार्यक्रम देशपातळीवर राबविण्यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत विशेष कार्यक्रम हाती घेतला आहे. सदर कार्यक्रम देशामध्ये ६०००० हेक्टर क्षेत्रावर राबविला जाणार असून, त्यापैकी राज्यामध्ये २०० हेक्टर क्षेत्रावर तेलताड विस्तार कार्यक्रम राबविला जाणर आहे. तेलताड या पिकास लागणारे हवामान, कोकण किनारपट्टी व लगतच्या क्षेत्रामध्ये अनकुल आहे. तेलताड हे पिक बहुवार्षिक असल्यामुळे या पिकास वर्षभर सिंचन सुविधा असणे आवश्यक आहे. त्यासाठी केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. २ जून, २०११ च्या पत्रान्वये एकूण रू. ९६.०० लाख रकमेच्या कार्यक्रमाला मान्यता दिली असून, राकृवियो कक्षाने त्यांच्या संदर्भाधीन अ.क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये, रू.४८.०० लाख रक्कम वितरित केली आहे. केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या रू. ९६.०० लाख कार्यक्रमास प्रशासकीय व राकृवियो कक्षाने वितरित केलेल्या रू. ४८.०० लाख कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने सन २०११ - १२ मध्ये तेलताड क्षेत्र विस्तार कार्यक्रम देशपातळीवर राबविर राबविला जाणार असून, त्यापैकी राज्यामध्ये २०० हैक्टर क्षेत्रावर तेलताड विस्तार कार्यक्रम राबविला जाणर आहे. केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. २ जून, २०११ च्या पत्रान्वये एकूण रू. ९६.०० लाख रकमेच्या कार्यक्रमाला मान्यता दिली असून, राकृवियो कक्षाने रू. ४८.०० लाख रक्कम वितरित केली आहे. केंद्र शासनाने दिलेली मान्यता विचारात घेऊन रू. ९६.०० लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय व राकृवियो कक्षाने वितरित केलेल्या रू. ४८.०० लाख निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रयोजनासाठी कृषि संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच सदर निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र ( Utilisation Certificate ) आयुक्त(कृषि)यांच्या स्वाक्षरीने राष्ट्रीय कृषि विकास योजना राकृवियो ) कक्षास सादर करण्यात यावे.

३.	केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. २ जून, २०११ च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मागदर्शक सूचनानुसार सन २०११-१२ मध्ये तेलताड विकास कार्यक्रम राबविण्यात यावा. केंद्र शासनाच्या पत्राच्या अनुषंगाने सदर योजना राबविण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना क्षेत्रिय स्तरावर संचालक ( फलोत्पादन ) यांनी निर्गमित कराव्यात.

४.	केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करून दिला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०९०८१४३८५९००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**सही /-**
**( वि. मा. बिवलकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
विभागीय आयुक्त पुणे व कोकण
जिल्हाधिकारी, ( सांगली, कोल्हापूर, सिंधुदुर्ग )
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,( सांगली, कोल्हापूर व सिंधुदुर्ग )
विभागीय कृषि सहसंचालक, कोल्हापूर व कोकण
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी ,( सांगली, कोल्हापूर व सिंधुदुर्ग )
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सांगली, कोल्हापूर व सिंधुदुर्ग )
जिल्हा कोषागार अधिकारी ( सांगली, कोल्हापूर व सिंधुदुर्ग )
मुख्या लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद ( सांगली, कोल्हापूर व सिंधुदुर्ग )
सहसंचालक लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला,मंत्रालयासमोर, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
नियोजन विभाग ( कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३
सर्व सह सचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग ( फलोत्पादन प्रभाग)
कक्ष अधिकारी / उपसचिव ( आरकेव्हीवाय कक्ष, कृषि व पदुम विभाग )
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
निवडनस्ती